सेवाग्राम, जिल्हा वर्धा विकास
आराखडा- निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सेविआ २०१६/प्र.क्र.१५/का.१४४३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ नोव्हेंबर, २०१६

वाचा : १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. सेविआ २०१३/प्र.क्र.१७/का.१४४३, दिनांक १ ऑक्टोबर, २०१६.
२) जिल्हाधिकारी, वर्धा यांचे पत्र क्र.कक्ष एल/विआ/संस-३/कावि-४५०/२०१६, दिनांक ७.११.२०१६.

प्रस्तावना :

सेवाग्राम विकास आराखडा, जि.वर्धा या प्रकल्पाच्या मे.अडारकर असोसिएट्स, मुंबई यांनी तयार केलेल्या रु.२६६.५३७५ कोटी रकमेच्या अंतिम आराखड्यास मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि.२६.२.२०१६ च्या बैठकीत आणि मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.७.७.२०१६ रोजी मुंबई येथे संपन्न झालेल्या शिखर समितीच्या बैठकीत तत्वत: मान्यता देण्यात आली आहे.

सेवाग्राम विकास योजनेच्या अंतिम प्रारूप आराखड्याच्या एकूण रु.२६६.५३७५ कोटी रकमेतून गांधी फॉर टुमारो (महात्मा गांधी संसाधन व प्रशिक्षण केंद्र) करिता असलेला रु.११३.६७५० कोटी अधिक त्यावरील सल्लागार शुल्क रु. ३.८६४९५ कोटी व जमिनीची किंमत रु.४.०० कोटी असे एकूण रु.१२१.५३९९५ कोटी इतकी रक्कम वगळून उर्वरित रु.१४४.९९७५ कोटी खर्चाचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी मा.मुख्यमंत्री महोदयांकडे सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास मा.मुख्यमंत्री महोदयांची मान्यता मिळाली असून दिनांक १.१०.२०१६ रोजी प्रशासकीय मान्यतेचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सदर आराखड्यातील कामांकरिता जिल्हाधिकारी, वर्धा यांनी दिनांक ७.११.२०१६ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार सन २०१६-१७ या वर्षासाठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

सेवाग्राम विकास आराखडा,जि.वर्धा या योजनेतील कामांसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी रु.२५.०० कोटी इतका निधी मार्च,२०१६ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर निधी जिल्हाधिकारी, वर्धा यांना खालीलप्रमाणे एकूण रु. २५.०० कोटी (अक्षरी रुपये पंचवीस कोटी फक्त) निधी लेखाशिर्षांतर्गत पुनर्वितरणाद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | उद्दिष्ट | सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी अर्थसंकल्पिय तरतूद | पुनर्वितरीत करावयाची रक्कम | पुनर्वितरीत केल्यानंतरची रक्कम | सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | २८-व्यावसायिक सेवा | ५.०० | (-) ४.४९५३ | ०.५०४७ | ०.५०४७ |
| २ | ५३-मोठी बांधकामे | २०.०० | (+) ४.४९५३ | २४.४९५३ | २४.४९५३ |
| | | एकूण | | २५.०० | २५.०० |

सदरहू खर्च मागणी क्रमांक ओ-१०, ४५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च, १०२-सामुहिक विकास, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०१)-बुहउद्देशिय कार्यक्रम, (०१)(४२)-सेवाग्राम विकास योजना, जिल्हा वर्धा (४५१५०८६१) या लेखाशिर्षांखाली खर्ची टाकण्यात यावा. वर नमुद केलेल्या लेखाशिर्षातर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या **खर्चाचा दरमहा ताळमेळ घालण्यात यावा. वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.**

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/ प्र.क्र.८९/ अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२११७२९५५९४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yatin Arvind Pimpley

Digitally signed by Yatin Arvind Pimpley
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yatin Arvind Pimpley
Date: 2016.11.21 17:32:16 +05'30'

**( य. अ. पिंपळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३) वित्त विभाग (व्यय-८), (अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर
५) जिल्हाधिकारी, वर्धा
६) जिल्हा नियोजन अधिकारी, वर्धा
७) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई
८) निवड नस्ती, नियोजन विभाग, का.१४४३, मंत्रालय, मुंबई.